आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात कृषि विद्यापीठांना सहाय्यक अनुदान या योजनेंतर्गत निधी वितरण.
**(लेखाशिर्ष २४०१ ८२९१ )**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
शासन निर्णय क्रमांकः **बीयुडी-२०२०/ प्र.क्र.०७/ कार्यासन. ६**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख: -२९ ऑक्टोबर,२०२०.

**वाचा -**

१) शासन परिपत्रक, कृषि व पदुम विभाग, क्र.मफुकृवि-२००९/ ३४१/ प्र.क्र.१३८/७-अे, दि.१९.०६.२०१३.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२०/ प्र.क्र.६४ / अर्थ-३, दि.१६.०४.२०२०.
३) कृषि व पदुम विभागाची नस्ती क्र. मफुवि १४२०/ प्र.क्र.७४/ ७-अे.

**प्रस्तावना:-**

कृषी व पदुम विभाग, शासन निर्णय दि.१९/०६/२०१३ अन्वये महात्मा फुले कृषी विद्यापीठ, राहूरी अंतर्गत कृषी महाविद्यालय, नंदुरबार या महाविद्यालयाच्या अनावर्ती खर्चासाठी व ५ वर्षाच्या आवर्ती खर्चासाठी एकूण रु.४०५७.२४ लाख इतका निधी आदिवासी उपयोजनेतून उपलब्ध करुन देण्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे. यास अनुसरुन कृषि व पदुम विभागाच्या वाचा क्र. ३ येथील नस्तीवर प्रस्तावित केल्यानुसार सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाकरीता महात्मा फुले कृषी विद्यापीठ, राहूरी अंतर्गत कृषी महाविद्यालय, नंदुरबार या महाविद्यालयाकरीता आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात मागणी क्र.टी.५ मधील २४०१-पीकसंवर्धन या मुख्य लेखाशीर्षाखालील कृषि विद्यापीठांना सहाय्यक अनुदान या योजनेकरीता अर्थसंकल्पित तरतूदीतून महात्मा फुले कृषी विद्यापीठ, राहूरी अधिनस्त कृषी महाविद्यालय, नंदुरबार या महाविद्यालयाकरीता वित्त विभागाने दिलेल्या सहमतीस अनुसरून खालीलप्रमाणे निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(रू.लाखात)

| अ.क्र. | योजनेचे नांव व लेखाशीर्ष | सन २०२०-२१ ची अर्थसंकल्पित तरतूद | सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेली तरतूद |
|---|---|---|---|
| १ | कृषि विद्यापीठांना सहायक अनुदान (२४०१ ८२९१), ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) | ५००.०० | १००.०० |

२. उपरोक्तप्रमाणे रू.१००.०० लाख ( अक्षरी रूपये एक कोटी फक्त) इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे. प्रकरणी विभागप्रमुख/ नियंत्रक अधिकारी यांनी सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र

अर्थसंकल्प नियमपूस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१६.०४.२०२० च्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

३. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून नियंत्रक अधिकारी यांनी झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टांबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाने **वाचा** येथील क्रमांक २ अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारात आणि अनौपचारिक संदर्भ क्र.४५९/ व्यय-१४, दि.२२.०९.२०२० अन्वये दर्शविलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१०२८१३०२२४९९२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra Digambarro Aute

Digitally signed by Ravindra Digambarro Aute
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c48977 37ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, cn=Ravindra Digambarro Aute
Date: 2020.10.29 14:40:39 +05'30'

**(रविंद्र दि. औटे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव.
२. मा.राज्यमंत्री ( आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव.
३. अपर मुख्य सचिव ( कृषि ), कृषि व पदुम विभाग,मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त( कृषि), महाराष्ट्र राज्य,पुणे.
५. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
६. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
७. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा/ नंदुरबार.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर/ नंदुरबार.
९. महालेखापाल (लेखापरिक्षा)/ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
१०. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. कार्यासन क्र. ९, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.